# जुळी मुंबई - चर्चेची चौकट

'साधना' साप्ताहिकाच्या १५ मे १९७१ च्या अंकात श्री. विजय तेंडुलकर यांनी 'नगरे, नियोजन, माणसे : एक उत्सुक अभ्यास' या शीर्षकाखाली जुळ्या मुंबईसंबंधी एक लेख लिहिला. त्यावर 'पडसाद' या पत्रव्यवहाराच्या सदरात श्री. पन्नालाल सुराणा यांची प्रतिक्रिया २२ मे १९७१ च्या अंकात, व श्रीमती सुधा गोगटे यांची टीका २९ मे १९७१ च्या अंकात प्रसिद्ध झाली. 'जुळी मुंबई : एक अपरिहार्यता' या शीर्षकाखाली श्री. तेंडुलकर यांचे उत्तर १९ जून १९७१ च्या अंकात प्रसिद्ध झाले. या पार्श्वभूमीवर, अधिक व्यापक व तपशीलवार चर्चेस आवाहन देणारा व त्यासाठी चर्चेची योग्य चौकट सुचविणारा प्रस्तुत लेख लिहिला आहे.

श्री. पन्नालाल सुराणा व श्रीमती सुधा गोगटे यांच्या टीकाटिप्पणीला उत्तर म्हणून लिहिलेल्या 'जुळी मुंबई : एक अपरिहार्यता' या आपल्या लेखात श्री. विजय तेंडुलकर अखेरीस म्हणतात, "..एका प्रकट चिंतनाच्या स्वरूपात माझा मूळ लेख मी लिहिला; ही भूमिका या चर्चेतही कायम आहे. माझी मते बदलण्यासारखे काही मिळाल्यास ते पत्करण्यास आजही मी तयार आहे."

प्रकट चिंतन असेल तर, काही गोष्टी घडणारच आहेत म्हणून त्या चर्चेच्या बाहेर ठेवण्याची भूमिका बरोबर नाही. जुळ्या मुंबईची उभारणी आज अटळ दिसते. जुळी मुंबई उभी रहात असताना, दुसरीकडे, ती उभी करण्याचा निर्णय चुकीचा होता हे जर पटले तर ती गोष्ट निरर्थक नाही. कारण मग अशा चुकांची पुनरावृत्ती होऊ नये यासाठी श्री. तेंडुलकरांना आपली शक्ती श्री. सुराणा व श्रीमती गोगटे यांच्या बाजूने लावता येईल. तोही काही कमी फायदा असणार नाही. तेव्हा, आपण चर्चा करू या, अशी जर श्री. तेंडुलकरांची भूमिका आहे तर, 'अमूक एक गोष्ट घडणारच आहे' हे त्या गोष्टीविरुद्धच्या आक्षेपाचे उत्तर म्हणून न सांगण्याची दक्षता त्यांनी घेतली पाहिजे. उत्तराचा हा प्रकार सत्ताधीशांच्या मुजोर, उद्दाम वृत्तीचा खास नमुना आहे. दुर्दैवाने, 'श्री. सुराणा या निर्णयालाच आव्हान देतात, तेव्हा तो बदलला जाऊ शकेल असा त्यांना - कोणत्या कारणांनी कोण जाणे - बालंबाल विश्वास वाटत असलेला दिसतो. कदाचित स्वतःच्या वा आपल्या राजकीय पक्षाच्या ताकदीविषयी त्यांना बरीच मोठी खात्री असावी. या शब्दांना या उद्दाम वृत्तीचा वास आहे. मी असे मानतो की श्री. तेंडुलकर यांनी चर्चेला दिलेले निमंत्रण सच्चे व गंभीर आहे आणि या भूमिकेतून या चर्चेत भाग घेत आहे.

'साधने'च्या १५ मे १९७१ च्या अंकातील आपल्या 'नगरे, नियोजन, माणसे' या लेखात श्री. विजय तेंडुलकर यांनी जुळ्या मुंबईचे नियोजन चालू आहे त्याची भलावण केली. कोणत्याही नियोजनाबद्दल म्हणता येईल असे सर्वसाधारण मुद्दे त्यांनी मांडले आहेत. ते सोडून चर्चेच्या दृष्टीने महत्त्वाचे मुद्दे तेवढे येथे त्यांच्याच शब्दांत उद्धृत करीत आहे व त्यासंबंधीची टीका नंतर देत आहे.

(१) 'सृजनशील' नगर-नियोजनाचा प्रयत्न नव्या मुंबईच्या संदर्भातच का? या प्रश्नाला त्यांचे उत्तर असे : कारण ज्या टापूत या महानगराचे नियोजन व्हावयाचे आहे त्या टापूत होऊ घातलेले मुंबईच्या तोडीचे एक मोठे बंदर व काही भागात चालू असलेली उद्योगधंद्यांची वाढ यामुळे लोकवस्ती वाढतच जाणार आहे. त्या भागाचे मुंबईशी संबंध जुळविणारे पूलही होत आहेत; त्यांनी मुंबईजवळ हा भाग अधिकच सरकेल. याचे नागरीकरण होतच जाईल. माणसे, घरे, व्यापार, उद्योग, वाहतूक, झोपडपट्ट्या, शाळा-कॉलेजे इत्यादींचे एक जाळे झपाट्याने तयार होतच जाईल. हे जाळे अनियंत्रित असले तर ते बेबंद वाढेल. नव्या मुंबईच्या टापूत तर ते समस्या निर्माण करीलच, परंतु मुंबईच्या समस्याही अधिक वाढवील.

'हे स्वस्थ बसून घडू देणे हा एक पर्याय किंवा असे घडू नये म्हणून या टापूत नियोजनाचा प्रयत्न करणे हा दुसरा पर्याय.' 'सृजनशील' नगरनियोजनाची सुरुवात नव्या मुंबईच्या उभारणीपासून का, या प्रश्नाचे उत्तर यात नाही हे शहाण्या वाचकांच्या लक्षात येईल. नाहीतरी या भागात शहरीकरण होणारच आहे, तर ते निदान व्यवस्थित व्हावे, असलेल्या समस्या जास्त बिकट करणारे न व्हावे, म्हणून

जुळ्या मुंबईची आखणी, अशी ही भूमिका आहे. या भूमिकेशी भांडण असण्याचे कारण नाही.

पण राज्याच्या हाती असलेल्या साधनसामग्रीचा उपयोग ज्या वेगवेगळ्या प्रकल्पांसाठी करता येईल त्यांमधून न्हावाशेवाचे बंदर, तळोजा व ठाणा-बेलापूर पट्टीतील औद्योगिक केंद्रे यांची निवड करणे - ज्यामुळे जुळ्या मुंबईचा प्रकल्प आवश्यक व इष्ट ठरतो असे तेंडुलकर म्हणत आहेत - योग्य होते का, आहे का, हे प्रश्न उपस्थित करणे योग्य व आवश्यक ठरते. 'नाल हाती आहेच, तर ती वाया जायची नसेल तर घोडाही घेणे अपरिहार्य आहे' असा प्रकार येथे घडत आहे का हे पाहणे वस्तुतः नियोजनसंघाचे सदस्य या नात्याने तेंडुलकरांचेही कर्तव्य ठरते. कारण, ज्या 'सिडको' यंत्रणेकरवी नवी मुंबई उभारली जात आहे व जिने हा नियोजनसंघ निर्माण केलाय तिने दिलेले आश्वासन असे आहे : 'हे नियोजित महानगर अशा तऱ्हेने संपूर्ण राज्याच्या विकासाच्या चित्रातील भाग म्हणूनच आखले जात आहे.' (नवी मुंबईः महाराष्ट्राचे महानगर, सिडको प्रकाशन.) याच पुस्तिकेत नियोजसंघाचे एक उद्दिष्ट पुढीलप्रमाणे नोंदविले आहे : संपूर्ण राज्यात उद्योगधंद्यांचे सारासार विचारपूर्वक व पद्धतशीर नियोजन व वाढ होऊन राज्यात नागरी केंद्रांचा समतोल विकास घडवून आणण्याच्या धोरणाचा पाठपुरावा केला जावा.

तेंडुलकर व नियोजनसंघ जी भूमिका घेत आहे त्यात ढळढळीत विसंगती आहे. वर उद्धृत केलेले उद्दिष्ट हे जर त्यांचे सच्चे उद्दिष्ट असले, या उद्दिष्टाविषयी ते जर गंभीर असले, तर जुळ्या मुंबईच्या उभारणीच्या निर्णयाने त्यांनी आपल्या अस्तित्वाला सुरुवात करणे गैर ठरते. कारण, न्हावाशेवाचे बंदर, बेलापूर-तळोजाची औद्योगिक केंद्रे, ठाणे खाडीवरील पूल, इत्यादी प्रकल्पांची इष्टानिष्टता त्यांनी प्रथम तपासली असती. दुसरे, आज हाती घेतलेल्या वरील प्रकल्पांतून 'बरीवाईट नगरे... उभी राहू घातलीच होती' हे खरे मानले तरी त्या नगरांचे सुव्यवस्थित नियोजन करण्याऐवजी, त्या सर्वांना पोटात सामावून घेणारी एक प्रति-मुंबईच उभारणे इष्ट होते, अपरिहार्य होते, असे नियोजनसंघाने कोठेच सिद्ध केलेले नाही.

जुळ्या मुंबईची कल्पना नियोजनसंघाला विचारान्ती सुचलेली नाही. जुळ्या मुंबईची कल्पना काही वर्षांपूर्वी श्री. शिरीष पटेल व श्रीमती परवीना मेहता यांनी मांडली होती. गाडगीळ कमिटीने ती न स्वीकारता उपकेंद्रांची योजना पुरस्कारिली होती. 'सिडको'ने प्रसिद्ध केलेल्या 'महाराष्ट्राचे नवे महानगर' या पुस्तिकेनुसार मुंबई महानगर प्रादेशिक नियोजन मंडळाने जुळ्या मुंबईची योजना स्वीकारली. हे मंडळ साऱ्या महाराष्ट्राच्या औद्योगिक व शहरी विकासाचा सारासार विचार करून निर्णय घेण्यासाठी होते वा तसा विचार करून त्यांनी निर्णय घेतला असे दिसत नाही. 'मुंबई प्रदेशा'चा विशिष्ट प्रश्न त्यांच्यासमोर होता.

जुळ्या मुंबईच्या उभारणीचा निर्णय कोणत्या मंडळाने कसा घेतला, का घेतला हे श्री. तेंडुलकर व नियोजनसंघ पुराव्यानिशी उघड करतील तर फार बरे होईल.

'सिडको' ही यंत्रणा स्टेट इंडस्ट्रिअल अँड इन्व्हेस्टमेंट कॉर्पोरेशन ऑफ महाराष्ट्र (सिकॉम) या महामंडळाची उपसंघटना (सब्सिडिअरी) म्हणून अस्तित्वात आली. जुळ्या मुंबईच्या उभारणीचे लक्ष्य समोर धरूनच ती अस्तित्वात आली, आणि हे उद्दिष्ट स्वीकारूनच नियोजनसंघ अस्तित्वात आला, या गोष्टी ज्ञात आहेत.

तात्पर्य, 'सारासार विचार करता, जुळी मुंबई उभारावी की काही अन्य पर्याय आहे,' हा प्रश्न नियोजनसंघाच्या कक्षेत कधीच नव्हता. वर उल्लेखिलेले उद्दिष्ट नंतर घुसडलेले उद्दिष्ट आहे. सारासार विचारापूर्वीच जुळ्या मुंबईच्या निर्मितीला नियोजनसंघ बांधला गेलेला आहे.

आपल्या १९ जूनच्या 'साधने'च्या अंकातील लेखात त्यांनी याची कबुली दिली आहे. 'आजच्या मुंबईतील वाढत्या समस्या सोडवण्याच्या कल्पनेतून नव्या मुंबईच्या योजनेचा जन्म झाला. नियोजनमंडळ तेव्हा अस्तित्वात नव्हते.' ते पुढे असे म्हणतात, “मंडळास पुढे या समस्यांचा व नव्या योजनेतील शक्यतांचा अभ्यास करता या समस्या सोडविण्यास एकटी ही योजना अपुरी आहे याची

जाणीव झाली." याचाच अर्थ असा की, जुळी मुंबई उभारावी हा निर्णय चुकीचा असण्याचा संभव आहे. पण तो निर्णय विचाराधीन नसल्याने, तो जास्तीत जास्त चांगल्या रीतीने राबविण्यावर नियोजनसंघ आपली शक्ती खर्च करीत आहे.

पण 'सिडको'तर्फे प्रसिद्ध झालेल्या पुस्तिकांमध्ये हा खरा प्रकार संघ लोकांपुढे ठेवत आहे का? तर नाही.

असे जर आहे तर, मुळातूनच आक्षेप घेणाऱ्यांचेच बरोबर नाही काय? विशेषतः, जुळ्या मुंबईच्या उभारणीने (आजच्या) मुंबईच्या समस्या सोडवता न आल्या तरी त्या हलक्या करण्यास काही ना काही प्रमाणात नियोजित महानगर हातभार लावू शकेल हा मंडळाचा विश्वास - आणि इतकाच विश्वास मंडळ बाळगून असल्याचे श्री. तेंडुलकर सांगतात - अवास्तव आहे असे ज्यांना वाटते त्यांच्या आक्षेपांचा विचार नियोजनसंघाने स्वतःच पुढाकार घेऊन करायला नको का? खुद्द संघच, 'काही ना काही प्रमाणात', 'इतकाच विश्वास' बाळगण्यापर्यंत खाली उतरलेला असताना तर संघ अशा मूलग्राही फेरविचारासाठी उत्सुक हवा. चूक होते आहे, ती सुधारून घेण्याची संधी अजूनही गेलेली नाही, असे आक्षेपकांनी म्हटले तर ते बरोबर नाही काय?

(२) 'विधायक व अभ्यासपूर्ण टीकेचे ते (नियोजनमंडळ) स्वागत करते व करील. अशा टीकेतील मुद्द्यांचा विचारही ते करत आलेले आहे' असे श्री. तेंडुलकर आपल्या १९ जूनच्या लेखात म्हणतात. मात्र, त्याच लेखात ते असेही म्हणतात, "नियोजित महानगराची अपरिहार्यता गृहीत धरून प्रकट झालेले विरोधी लोकमत उपयुक्त ठरेल."

आणि आजच्या टीकेबद्दल त्यांचे मूळच्या १५ मे च्या अंकातील उद्गार असे: "विचारी माणसे वैयक्तिक अहंकारापायी वा दुराग्रहापायी कित्येकदा अशी हमी देतात, तर राजकारणी माणसे मतलबापायी ती छातीवर हात मारून देत राहतात. अशिक्षित माणसे हा मतलब फत्ते करणारा दारुगोळाच असतो. त्यांना तापवण्यात येते व ते फुटतात, परंतु सुशिक्षित माणसांमध्ये - आपल्या सुशिक्षित माणसांमध्ये - निष्क्रियपणे शंका घेण्याचीच वृत्ती आढळते. देशात अनेकानेक योजना यशस्वी होऊनही केवळ फसलेल्या वा कुजलेल्या योजनांचीच ऐकीव वा वाचीव माहिती त्यांस असते! सरकारी पातळीवर लाचबाजी व गोंधळाशिवाय दुसरे काहीच होत नसते, असा त्यांचा ठाम समज असतो. या अविश्वासाने ते प्रत्येक नियोजनाकडे पाहतात. नियोजनातील अपयशाचे संभाव्य पन्नास टक्केच त्यांच्या लेखी असतात. उरलेले संभाव्य यशाचे पन्नास ते सोयीस्करपणे विसरतात." आपल्या १९ जूनच्या लेखात ते आपल्याकडे होणाऱ्या टीकेविषयी लिहितात, "होते ती (टीका) ठरीव गृहीत ठोकळेबाज सिद्धांताधारे विकोपाची व नकारात्मक टीका. ही कित्येकदा उघड उघड हितसंबंधी असते. कित्येकदा ती पूर्णतया अप्रामाणिक वा दुतोंडी असते." 'सिडको'ने प्रकाशित केलेल्या 'महाराष्ट्राचे नवे महानगर' या पुस्तिकेत जुळ्या मुंबईला आक्षेप घेणाऱ्यांना 'संशयात्मे' असे संबोधले आहे, त्यातला तुच्छताभाव उघड दिसतो. विरोधकांबद्दल 'सिडको' काय म्हणते? "स्थानिक जनतेचे हित नियोजित महानगरामुळे धोक्यात येऊ नये, उलट ते वाढावे या हेतूने काय करता येईल याचा विचार चालू असतानाच महानगर टापूतील राजकीय हितसंबंधांनी परिस्थितीचा फायदा घेण्यास सुरुवात केली व हां हां म्हणता संभ्रमित जमीनमालकांचा संघटित विरोध महानगर योजनेच्या मार्गात उभा राहिला.

शेवटी, विरोधकांचे व्यक्तिमत्व श्री. तेंडुलकर कसे रेखाटतात ते पुढील वाक्यावरून दिसून येईल. "परंतु काही न करता स्वस्थ बसून जे घडेल तसे घडू देण्यातील वा केवळच शंका उपस्थित करत राहण्यातील धोक्यापेक्षा तो (जुळी मुंबई उभारण्याचा प्रयत्न) स्वीकार्य होय. कारण त्यात पुरुषार्थ आहे."

जुळी मुंबई उभारण्याचा निर्णय शासनाने लोकांसमोर विचारार्थ ठेवला होता, त्यासंबंधी जे आक्षेप घेतले गेले त्यांचा नीट विचार केला गेला, व मग तो निर्णय पक्का केला, असे घडल्याचे 'सिडको'च्या पुस्तिकांमध्ये नमूद नाही. असे महत्त्वपूर्ण निर्णय पक्के करण्याआधी वर्ष-सहा महिने त्या निर्णयाच्या

विरुद्धचे आक्षेप पुराव्यानिशी मांडण्यास अवसर देण्याची रीत रूढ आहे. एक स्वतंत्र, स्वायत्त आयोग त्यासाठी नेमून या आक्षेपांची नोंद केली जाते, त्यावर विचारविमर्श होऊन, दरम्यानच्या काळात व्यक्त झालेले विरोधी व अनुकूल लोकमत लक्षात घेऊन शासन निर्णय करीत असते. लोकशाहीला धरून गोष्टी करायच्या तर लोकांचे हितसंबंध व्यक्त होण्यास अवसर हा दिलाच पाहिजे. तो न देण्याने आपण प्रस्थापित सत्तारूढ हितसंबंधच फक्त जपतो. जुळ्या मुंबईच्या बाबतीत निर्णय अवचित लादला गेल्याकारणाने, ज्यांना जुळ्या मुंबईची उभारणी नापसंत होती त्यांपैकी काहींना विरोधाचे राजकारणी, आंदोलनात्मक मार्ग अवलंबणे भाग पडले. 'सिडको' - व पर्यायाने शासन - या पापाचे धनी आहे.

दुसरी गोष्ट, सर्वच विरोधकांच्या प्रामाणिकतेविषयी शंका घेण्याची ही रीत बरोबर आहे काय? श्री. तेंडुलकर (व नियोजनसंघ) यांना 'विधायक व अभ्यासपूर्ण टीका' खरोखरच हवी असेल तर विरोधकांविषयी दर्शविलेल्या अनुदार व अपमानकारक वृत्तीबद्दल प्रथम त्यांनी माफी मागावयास हवी.

तिसरी गोष्ट, 'अमुक गोष्टी अटळ मानून चाला', 'अमुक उपाययोजना विचाराधीन नाही' अशा एकतर्फी निवाड्यांचा अधिकार श्री. तेंडुलकर (वा नियोजनसंघ) आपणाकडे घेणार असेल तर, विधायक टीका कोणती व विकोपाची, नकारात्मक टीका कोणती हे स्वतःच्या लहरीप्रमाणे ठरविणार असेल तर त्यांचे लेखन हे प्रकट चिंतनाच्या स्वरूपाचे आहे वा ते चर्चा करू इच्छितात असे कसे समजावयाचे?

(३) आपली उद्दिष्टे नियोजनसंघाने 'नवी मुंबई : महाराष्ट्राचे महानगर' या पुस्तिकेत जाहीर केली आहेत. आपल्या कामाचा संदर्भही त्याने स्पष्ट केला आहे. याशी सुसंगत असे सर्व प्रश्न चर्चेसाठी खुले आहेत असे मानले पाहिजे. जुळ्या मुंबईची योजना आणखी वर्षभराने कार्यान्वित झाल्याने आभाळ कोसळणार नाही. या दृष्टीने वरील पुस्तिकेतील प्रस्तुत असा भाग पुढीलप्रमाणे आहे:

(i) 'मुंबईतली माणसांची प्रचंड आवकही तसतशी वाढत होती. आणि जमीन काही म्हणण्यासारखी वाढू शकत नव्हती. यातून निर्माण होणारा हाहाःकार टाळता कसा येईल? आजच्या मुंबईचे काय होणार?’ या प्रश्नापासून महाराष्ट्र शासनाने प्रस्थान ठेवल्याचे नमूद आहे. हा मुद्दा नियोजनसंघाला सोयीस्करपणे सोडून देता येणार नाही

आजच्या मुंबईच्या संदर्भात आपली जबाबदारी काय आहे असे नियोजन संघ मानतो? तर (अ) मुंबईकडे येत राहणारा लोकसंख्येचा ओघ या नव्या शहराकडे वळावा. (ब) मुंबई शहरातील वरकड लोकसंख्या तेथे सामावून घेतली जावी. पण त्याच पुस्तिकेत अन्यत्र म्हटले आहे, 'नवे महानगर मुंबईच्या वाढीचा काही भागच स्वतःकडे घेऊ शकणार होने आजच्या गर्दीच्या थोडा भागच खेचून घेऊ शकणार होने. केवळ नव्या महानगराने मुंबईचा गजेंद्रमोक्ष होणार नव्हता. हा गजेंद्रमोक्ष करण्याची जबाबदारीही नियोजनसंघ व सिडको यांची आहे.

(ii) 'मुंबईतील विकासाचे लोण हे नियोजित महानगर महाराष्ट्राच्या एका सर्वात मागासलेल्या भागापर्यंत पोचवू शकणार होते. हा भाग कोकण-मुंबईत अडकून पडलेली भरभराटीची गंगा ते कोकणपर्यंत नेण्याची ईर्षा बाळगणार होते. त्यासाठी झटणार होते.’

(iii) 'भोवतालच्या तसेच संबंध राज्याच्या विकासाच्या दृष्टिकोनातून पाहता दळणवळणाच्या सोयी, लोकसंख्येचा ओघ, संबंध राज्यातल्या उद्योगधंद्यांच्या विकासाची दिशा व प्रयत्न यांचा विचार व्हायला हवा व त्यांच्या एकूण पार्श्वभूमीवर नव्या महानगराची उभारणी करायला हवी.' आणि, ‘संपूर्ण राज्यात उद्योगधंद्यांचे सारासार विचारपूर्वक व पद्धतशीर नियोजन व वाढ होऊन राज्यात नागरी केंद्रांचा समतोल विकास घडवून आणणाऱ्या धोरणाचा पाठपुरावा केला जावा.’

(iv) 'राहणीमान सुधारेल व समाजाच्या सर्व थरांतील भेदभाव कमी होतील अशा तऱ्हेने सर्व सामाजिक व इतर सुखसोयींची तरतूद केली जावी.' तसेच, नागरिकांना परिपूर्ण व समृद्ध जीवन

जगता येईल व मुंबईच्या नागरी जीवनात नित्य निर्माण होतात त्याप्रकारचे सामाजिक ताण निर्माण होणार नाहीत अशा तऱ्हेचे या महानगराचे स्वरूप राहावे.' आणि, सर्वसामान्य माणसास जगण्यायोग्य परिसर देणारे; योग्य अशा मोठ्या प्रमाणावरील वाहतुकीच्या सोयी, परवडतील अशा किमतीत सुंदर राहण्यायोग्य घरे व इतर सर्व सामाजिक व भौतिक सुखसोयी पुरविणारे हे महानगर ठरले पाहिजे.'

(v) 'हे नियोजित महानगर अशा तऱ्हेने संपूर्ण राज्याच्या विकासाच्या चित्रातील एक भाग म्हणूनच आखले जात आहे त्या दृष्टीने आपल्या देशात आज उभ्या ठाकणाऱ्या नागरीकरणाच्या गुंतागुंतीच्या समस्यांना तोंड देण्याच्या योजनेपैकी या महानगरीची उभारणी हा पहिला टप्पा समजण्यास हरकत नाही.'

(vi) 'तसेच महानगराच्या टापूतील विकासात उद्योगधंद्यांप्रमाणे शेतीसही महत्त्व देऊन तेथील आजचा शेतकरी निर्वासित होणार नाही या दृष्टीने तरतूद केली आहे.' ('महाराष्ट्राचे नवे महानगर)

आपण पुढे ठेवलेली उद्दिष्टे साध्य करण्याच्या दृष्टीने 'नवी मुंबई'चे महानगर वसविण्यास अग्रक्रम दिला पाहिजे असे नियोजनसंघाचे मत असू शकते. ते इतरांना पटविण्याची जबाबदारी नियोजनसंघाने उचलली पाहिजे.

(४) पण, नव्या मुंबईची उभारणी काही झाले तरीही करावयाचीच, असा निर्णय दिसतो. सत्ताधारी राजकारण्यांच्या जिवावरच हा निर्णय केला गेला आहे, तेव्हा विरोधकांना उद्दामपणे दुर्लक्षून तशी निर्मिती होईल हे आजचे विधिलिखित दिसते. त्याही परिस्थितीत नियोजनसंघ एका विशिष्ट प्रकारचे महानगर निर्माण करण्यास वचनबद्ध आहे. जुळी मुंबई मान्य केल्यावरही, तिची उभारणी हा विषय उरतोच.

एकदा आपली उद्दिष्टे वरीलप्रमाणे स्पष्ट केल्यावर वरील उद्दिष्टे साध्य करण्याच्या दृष्टीने नागरीकरणासंबंधीचे धोरण काय असावयाला हवे, नवे महानगर हा इष्ट नागरीकरणाचा पहिला टप्पा मानता येईल काय, या व यांसारख्या मूलभूत प्रश्नांची चर्चा श्री. तेंडुलकर (वा नियोजनसंघ) अटळतेचा मुद्दा पुढे करून टाळू शकत नाहीत. ही उद्दिष्टे स्वीकारल्यावर तसे करणे त्यांना शोभून दिसत नाही.

'सिडको'च्या 'महाराष्ट्राचे नवे महानगर' या पुस्तिकेत शेवटी एक वाक्य आहे : 'शहरीकरणाविना विकास नाही व विकासाविना तरणोपाय नाही.' हा एक 'ठरीव गृहीत ठोकळेबाज सिद्धांत' आहे असे मला म्हणावयाचे आहे. मानवी वसतीची जी काही रचना आपण करू त्यात शहरे आवश्यकतः असणार; पण याचा अर्थ शहरीकरण ही सर्व काळी, सर्व परिस्थितीत, अमर्याद स्वरूपात एक इष्टच गोष्ट आहे असे म्हणणे चुकीचे होईल. भारताच्या विशिष्ट संदर्भात 'महाराष्ट्राच्या सर्वांगीण विकासाच्या' उद्देशाने प्रस्थान ठेवणाऱ्या नियोजकांच्या तोंडी असे बेजबाबदार विधान भयावह ठरते.

पण नवे महानगर निर्माण होणार हे गृहीत धरून, त्या महानगराची म्हणून जी विशिष्ट उद्दिष्टे नजरेसमोर ठेवली आहेत त्यांच्या संदर्भातही चर्चा करण्यास हरकत नाही. मात्र अशी चर्चा करण्याआधी काही गोष्टींचा खुलासा होणे आवश्यक आहे.

(i) अशा चर्चेत चर्चा करणाऱ्यांचा दर्जा समान असला पाहिजे. म्हणजेच, 'हे अटळ आहे', 'त्याला इलाज नाही', 'आम्हाला घ्यायचा तो निर्णय आम्ही घेतलेला आहेच', 'तुमचा फारच आग्रह असेल तर करू चर्चा, पण निर्णय बदलणार नाही' अशी उत्तरे दिली जाता कामा नयेत.

(ii) 'नियोजकमंडळ आपल्या अधिकाराच्या व कामाच्या कक्षेत महाराष्ट्र शासनाने काय करावे व काय न करावे हे सातत्याने व सप्रमाण सुचवत आहे, त्याचा पाठपुरावा करत आहे.' वा 'अमूकतमूक याचा विचार केला जात आहे' या प्रकारच्या उत्तरातून काही प्रकाश पडत नाही. नियोजकमंडळ काय विचार करीत आहे व काय पाठपुरावा करीत आहे हे नेमकेपणे मांडले गेले पाहिजे.

(iii) या दृष्टीने उपयोगी चर्चा व्हावयाची असेल तर नियोजनसंघाच्या बैठकीतील चर्चांचा वृत्तांत, 'सिडको'च्या योजनांच्या कार्यवाहीचे यशापयश स्पष्ट करणाऱ्या फायली केवळ एका बाजूलाच उपलब्ध असून चालणार नाही. 'गोपनीयते'च्या संरक्षक पडद्याआड काम करण्याची सरकारी पद्धत अशा चर्चेस मारक ठरेल.

(iv) ‘लोकमताचे पाठबळ हवे' असल्याचा हवाला श्री. तेंडुलकर देतात. तसेच, 'कोणत्याही शासनावर येणाऱ्या अन्य दडपणांचा प्रतिकार करण्यासाठी डोळस व सुजाण लोकमताचे कायम व विधायक दडपण शासनावर असावयास हवे.' असेही त्यांनी म्हटले आहे. टीका विधायक असली तरच नियोजकमंडळास विशुद्ध लोकशाहीचा विचार ठेवून नव्या मुंबईचे नियोजन प्रत्यक्षात आणण्यास परिणामकारक नैतिक पाठबळ मिळेल.

नियोजनसंघाला आपल्या पाठीशी लोकमत असावे असे वाटत असेल तर ती एक फार इष्ट गोष्ट आहे. पण मग नियोजनसंघाने काही गोष्टींबाबत बांधिलकी स्वीकारली पाहिजे. उदाहरणार्थ, शासनावर दडपण आणूनही शासन गैर मार्गाने जाऊ लागल्यास, चुकीची धोरणे अवलंबू लागल्यास, विधायक लोकमतास चिरडून टाकू लागल्यास नियोजनसंघ अशा लोकमताचा कैवार घेऊन शासनाविरुद्ध उभा ठाकेल, असे आश्वासन नियोजनसंघाने दिले पाहिजे. एरवी (श्री. तेंडुलकरांच्याच शब्दांत) ‘नियोजकांच्या सृजनशीलतेचा खेळ.होईल; परंतु त्यात कदाचित माणसांच्या आयुष्याचा खेळखंडोबा होणार नाही काय?' असे विचारणे अनुचित ठरणार नाही.

या चार मुद्द्यांवरून खुलासा झाला म्हणजे चर्चा पुरेशा मोकळेपणाने व गांभीर्याने होणार आहे की नाही ते स्पष्ट होईल.

केली तर नियोजनसंघाच्या वतीनेच श्री. तेंडुलकर यांनी चर्चा करावी असे म्हणणे गैर ठरेल. त्यांच्या लेखनात ते नियोजनसंघाच्या वतीने कधी लिहितात, कधी एक व्यक्ती म्हणून. पण एक व्यक्ती म्हणून चर्चा केल्यास तीही, चर्चेत भाग घेणाऱ्यांनाच केवळ नाही तर सर्वांनाच उपयोगी ठरेल.

'सिडको'ने जन्माला घातलेल्या, नवी मुंबई उभारण्याची बांधिलकी लादूनच आमंत्रित केलेल्या नियोजन संघाचे आपण सभासद आहोत हे विसरून श्री. तेंडुलकरांनी कलावंताच्या सच्चेपणाने व तटस्थतेने या पुस्तिका वाचून पाहाव्यात. ग्राहकाला भूल पाडून आपला माल विकण्याची एक कला हल्ली उत्कर्ष पावली आहे. माल विकावयाचा असल्याने, खऱ्याखोट्याचा मुलाहिजा बाळगून चालणार नाही, अशी या कलेच्या उपासकांची भूमिका असते. या पुस्तिकांना याच भयावह भूमिकेचा वास मारतो. नियोजनसंघाला माणसांची कदर असल्याची हीच पवती मानावयाची काय?